१)

२०१४०८१४१५२९३२९९२३

**महाराष्ट्र शासनाच्या महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळामार्फत पर्यटकांसाठी राबविण्यात येणारी निवास व न्याहारी योजना वृध्दींगत करण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग,**
**मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,**
**शासन निर्णय, क्रमांक टिडीएस २०११/७/प्र.क्र.४४१(भाग -२)/पर्यटन,**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.**
**दिनांक : ३१ मार्च, २०१२.**

**प्रस्तावना:-**

महाराष्ट्रात पर्यटनवृध्दी व्हावी आणि स्थानिक लोकांचा पर्यटनामध्ये जास्तीत जास्त सहभाग व्हावा तसेच बेरोजगारांना स्वयंरोजगार मिळावा, यासाठी शासनाने सन १९९७ पासून "निवास व न्याहारी योजनेतंर्गत" स्थानिक घरमालकांना (नोंदणीधारकांना) २ ते ६ खोल्या पेईंग गेस्टच्या धर्तीवर पर्यटकांना सेवा सुविधा उपलब्ध करुन देण्याकरिता महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळामार्फत मंजूरी देण्यात येते. या योजनेतंर्गत आतापर्यंत एकूण ७८५ नोंदणीधारक असून दरवर्षी नूतनीकरणासाठी अर्ज महाराष्ट्र पर्यटन महामंडळाकडे प्राप्त होत आहेत.

२. ही योजना यशस्वीपणे राबविण्यासाठी नगर विकास विभागामार्फत शासन निर्णय क्र.जीइएन १०९७/४१४/प्र.क्र.३४/नवि १४, दि.३ फेबुवारी १९९७ अन्वये पुढील निर्णय घेण्यात आले आहेत.

१. राज्यातील सर्व महानगरपालिका/नगरपरिषद यांनी वरील योजनेंतर्गत जी निवास्स्थाने नोंदवली जातील त्या घरांच्या/निवासांच्या रेटेबल किंमतीत कोणत्याही प्रकारची वाढ करु नये.
२. या योजनेंतर्गत नोंदणी केलेल्या घरासंबंधी महानगरपालिकांनी/नगरपरिषदांनी प्रत्येक खोली मागे मालमत्ता कराचे दर १० टक्के ते २० टक्केपेक्षा जास्त वाढवू नयेत.
३. हॉटेल्स् आणि उपहारगृहे यांना लागू असलेले महानगरपालिकेचे/नगरपालिकेचे नियम अटी आणि कर या योजनेतंर्गत पर्यटकांसाठी उपलब्ध होणाऱ्या सोयी / खाद्यपदार्थ यांना लागू करण्यात येवू नयेत.

तसेच ग्राम विकास विभागामार्फत शासन निर्णय क्र. व्हीपीएम १०९७/प्र.क्र.४०१/२२, दि. २७ मे १९९८ अन्वये पुढील निर्णय घेण्यात आले आहेत.

१. राज्यातील सर्व ग्रामपंचायतींनी वरील योजनेअंतर्गत जी निवासस्थाने नोंदवली जातील त्या घरांच्या/निवासांच्या करात कोणत्याही प्रकारची वाढ करु नये.
२. मुंबई ग्रामपंचायत अधिनियम, १९५८ चे कलम १२४(१) अन्वये हॉटेल्स् आणि उपहारगृहे यांना लागू असलेले नियम व अटी आणि कर या योजनेतंर्गत पर्यटकांसाठी उपलब्ध होणाऱ्या सोयी / खाद्यपदार्थ यांना लागू करण्यात येऊ नयेत.

३. तथापि शासनाच्या वित्त विभागाकडून ऐषाआराम कर कायद्याखाली या योजनेतील योजनाधारकांना ऐषाराम कर भरण्याबाबत सक्ती केली जाते, यामुळे योजनाधारकांना योजना राबविण्यासाठी अडचणी येतात. त्यामुळे ऐषाआराम कर कायद्याखाली या योजनेतील योजनाधारकांना उपरोक्त कर भरण्याबाबत पुढील निर्णय घेण्यात आला आहे.

**शासन निर्णय:-**

मुंबई, ठाणे, नवी मुंबई व पुणे वगळता उर्वरित महाराष्ट्र राज्यामध्ये निवास व न्याहरी योजनेतंर्गत नोंदणीकृत घरमालकांना ऐषाराम करातून सूट देण्यास मंजूरी देण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने व अनौपचारिक संदर्भ क्र.१७/कराधान-२, दि.२.११.२०११ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या नावाने व आदेशानुसार,

**(दिलीप शिंदे)**
**उपसचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. मंत्री (पर्यटन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
२) मा. राज्य मंत्री (पर्यटन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
३) सर्व विधान सभा सदस्य व विधान परिषद सदस्य, महाराष्ट्र विधानमंडळ, मुंबई
४) महालेखापाल, महाराष्ट्र - १, (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), मुंबई
५) महालेखापाल, महाराष्ट्र - २, (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), नागपूर
६) महालेखापाल, (स्थानिक निकाल लेखा परिक्षा/लेखा), मुंबई
७) मुख्य सचिव यांचे उपसचिव, मंत्रालय, मुंबई
८) प्रधान सचिव, महसूल, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२
९) प्रधान सचिव, वित्त, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई ३२
१०) प्रधान सचिव, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२
११) प्रधान सचिव, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२
१२) सचिव, ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२
१३) सर्व अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/सचिव, मंत्रालय, मुंबई
१४) सर्व विभागीय आयुक्त
१५) सर्व जिल्हाधिकारी
१६) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ, मुंबई
१७) सर्व जिल्हा नियोजन अधिकारी
१८) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१९) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
२०) नियोजन विभाग (कार्यासन-१४११/१४४४), मंत्रालय, मुंबई
२१) वित्त विभाग (का.व्यय-१४/अर्थोपाय) मंत्रालय, मुंबई
२२) उप सचिव, पर्यटन, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई
२३) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ, मुंबई
२४) निवडनस्ती